।। श्रीगणेशाय नमः ।।

# मुद्गल पुराण

( प्लॅस्टिक कव्हरसह )

: लेखक :

प्राध्यापक गो. ह. कुलकर्णी




द्विमित्र प्रकाशन, मुंबई ४.

प्रकाशक :
प्रभाकर शिवराम आवटी
द्विमित्र प्रकाशन,
द्वारा / श्री भारत बुक डेपो,
ठाकुरद्वार नाका, मुंबई ४.



किंमत २० रु.

मुद्रक :
आर. डी. मांद्रेकर
बी. एससी., एलएल. बी.,
इंडो फॉरेन प्रिंटींग वर्क्स,
मु पो. नागाव, इंग्रजी शाळेसमोर,
ता. अलिबाग, जि. रायगड.

# दोन शब्द

श्रीगणेश ही एक हिंदूना सर्वाधिक प्रिय असलेली देवता ही देवता ऋद्धिसिद्धि प्रदान करणारी, सर्वसुख प्रदान करणारी, विघ्ने हरण करणारी व विद्येचे दान देणारी आहे. कोणत्याही कार्यारंभी गणेशाचे पूजन करून मगच कार्यारंभ करण्याची प्रथा आहे. अशा ह्या गणेश देवतेच्या संबंची माहिती व कथा सांगणारे दोन मुख्य ग्रंथ लोकप्रिय आहेत. एक 'गणेशपुराण' व दुसरा 'मुद्गलपुराण.' ह्या दोन ग्रंथापैकी 'गणेशपुराण' सार रूपाने उपलब्ध आहे पण 'मुद्गल पुराण' मात्र गेली बरीच वर्षे उपलब्ध नव्हते म्हणून साररूपाने 'मुद्गल पुराण' प्रसिद्ध करण्यास आनंद वाटत आहे.

'मुद्गल पुराण' ह्या मूळ संस्कृत ग्रंथाची रचना नऊ खंडात झालेली असून त्यात एकूण ४२८ अध्याय व श्लोकसंख्या २३००० एवढी आहे. असा हा प्रचंड ग्रंथराज ह्या ग्रंथाचे कर्ते मुग्दल ऋषि यांच्या नावानेच प्रसिद्ध आहे. गाणपत्य संप्रदायात 'मुग्दल पुराणा' ला अतिशय मान आहे 'गणेशपुराणा' तल्या सर्व कथांचा ह्यात समावेश आहेच शिवाय इतर पुराणात ज्या गणेश कथा आढळतात त्या कथांचाही समावेश ह्या ग्रंथात केला आहे. 'मुग्दल पुराण' हे परंपरागत अठरा महापुराणे व उपपुराणे यापैकी कशातच समाविष्ट नाही; तरीही गणेश भक्तांच्या दृष्टिने 'मुग्दल पुराणाचे' महत्व अनन्य साधारण आहे. हे त्याचे महत्व दोन-तीन कारणासाठी आहे.

हे पुराण गणेशाच्या अध्यात्मिक स्वरुपाचे वर्णन करणारे असून रूपकात्मक आहे. ह्या पुराणात वर्णिलेले मत्सरासुर, दंभासुर, क्रोधासुर, कामासुर, लोभासुर, आणि मदासुर हे माणसाच्या अंतःकरणातील षड्रिपु असून त्यांचा नाश गणेश कृपेने होतो हेच ह्या पुराणात अप्रत्यक्ष रित्या सांगितले आहे. ' गणेश पुराणात गणेशासंबंधी साक्षेपाने व विस्ताराने लिहिले गेले आहे, पण मुद्गल ऋषिनी मुद्गल पुराणाद्वारा गणेशतत्त्वाचा सर्वांगपरिपूर्ण विचार विस्ताराने मांडला आहे. मुद्गल पुराण गुणवत्तेने, शद्बार्थ गांभीर्याने विशेष उल्लेखनिय झाले आहे. शिव, विष्णु उपाधि असलेल्या ब्रह्मप्रतिपादक पुराणांची रेलचेल असताना मुग्दल पुराणाची काय आवश्यकता ? ह्या प्रश्नाला मुद्गल ऋषिंनी सुरवातीलाच उत्तर दिले आहे. ते ह्मणतांतः— शिव, विष्णु उपाधि असलेले ब्रह्म हे मुख्य नाही, कारण ते महावाक्यात वर्णित नाही. मात्र गणेशतत्त्व ' तत्त्वंमसि ' या महावाक्यातच प्रकट झालेले आहे. त्वं पदं नरश्च तत्पद गजश्च एतयोरमेदात्मको गणेशदेहः प्रत्यक्ष ब्रह्मात्मकत्वात् ' या मुद्गल ऋषिंनी मांडलेल्या सिद्धांताचा विस्तार त्यांनी नऊ खंडात केला आहे. या पुराणात सगुणनिर्गुणांचा व व्यक्ताव्यक्तांचा अंतर्भाव करून दोघांची उत्पत्ति व नियमन करणाऱ्या स्वानंदवासी श्रीगणपतीच्या अवताराच्या कथा आहेत. या ग्रंथात सर्व श्रुतिस्मृतींस मान्य जे अद्वैतब्रह्मतत्त्व त्याचा अंगिकार करून त्या ब्रह्माची प्राप्ति होते ती विहित नित्यकर्माचे निष्काम आचरण, निष्कामभक्तिने श्रींगणेशाची नवविध सेवा आणि सर्व ज्ञानविज्ञानांचा अंतर्भाव करणारे शुद्धज्ञान यांच्या द्वाराच होते हे ह्यातील कथाद्वारे

पटवून दिले आहे. सर्व जीव आपआपल्या वर्णाश्रमधर्मानुसार चालत असले ह्मणजे ब्रह्म हें साक्षित्वाने राहते; पण कामक्रोधादिकांच्या उत्कर्षाने जीव आसुरी व उन्मत्त झाले म्हणजे या स्वानंदवासी ब्रह्माला सगुणत्व प्राप्त होऊन अवतार सिद्ध होतो आणि उन्मादाचा विच्छेद होतो, हा सर्व गणेशचरित्राचा सारांश आहे. येथे ज्याला गणेशब्रह्म म्हटले आहे त्याला दुसरीकडे शिव किंवा विष्णु या रूपाने वर्णिलेले असले तरी सर्वत्र एकवाक्यता ही आहे की, प्रत्येक भारतीय आर्यधर्मग्रंथात उपनिषद्प्रणित ब्रह्माचा मात्र स्विकार केला आहे. उपासना मार्ग निराळे असले तरी सर्व उपासनांचे रहस्य एकच असल्यामुळे प्राप्तव्यांत ( ब्रह्मस्वरूपात ) भेदभावाला जागाच मिळत नाही. म्हणून इतर पुराणांशी या पुराणाचा विसंवाद नाही. या पुराणांत गणपतीच्या मुख्य मुख्य नावांचे निर्वचन दिले आहे हे अवश्य लक्षांत ठेवावे.

नैमिष नावाच्या महारण्यांत ज्ञानयज्ञ चालू होता त्यावेळीं शौनक ऋषींच्या विनंतीवरून रोमहर्षण नावाच्या सूताने ज्या कथा सांगितल्या त्याच कथा मुद्गल पुराणात समाविष्ट केलेल्या आहेत. दक्ष–मुद्गल संवाद रूपाने हे पुराण विस्तार पावते. प्रत्येक खंडात एक यानुसार वक्रतुंड, एकदंत, महोदर, गजानन, लंबोदर, विकट, विघ्नराज आणि धूम्रवर्ण अशा आठ अवतारांच्या लिला विस्ताराने वर्णिलेल्या आहेत. या अवतार लिलांच्या वर्णनाद्वारे गणेश हेच परब्रह्म असल्याचे आग्रहपूर्वक प्रतिपादन केले आहे. नाना रूपक कथा, स्तोत्रे, तीर्थक्षेत्रे, पुण्यक्षेत्रे यांचे वर्णन, गाणपत्यांच्या कथा व अवतार इ. वैशिष्ट्यांनी हे पुराण समृद्ध आहे. सबंध वर्षातील शुद्ध पक्ष आणि वद्य पक्ष यांत येणाऱ्या चतुर्थ्यांचे पूजाविधि, त्यांची

फले यासंबंधीची शास्त्रशुद्ध माहिती दिलेली असून त्या त्या व्रतांची फले कोणा कोणाला अनुभवास आली त्यांच्याही कथा ह्यात आढळतात. भारतात जी सिद्धक्षेत्रे आहेत त्यापैकी स्वानंदभुवन (मोरगाव) या क्षेत्राचे विस्तृत वर्णन या क्षेत्राची लोकविलक्षण ख्याति सिद्ध करणारे आहे.

अशा प्रकारे गणेश भक्तांना उपयुक्त व योग्य मार्गदर्शन होण्याच्या दृष्टीने हे पुराण अत्यंत उपयोगी ठरेल यात कांही संशय नाही. गणेश भक्त ह्या ग्रंथाचे चांगले स्वागत करतील ही अपेक्षा. ह्या ग्रंथात कांही त्रुटी आढळल्यास व त्या दृष्टोत्पत्तीस आणून दिल्यास पुढील आवृत्तीच्या वेळी त्या त्रुटी दूर करण्याचा प्रयत्न करू. धन्यवाद.

प्रभाकर आवटी

## स्वतः श्रीगणेश म्हणतात–

'मुग्दल पुराणा' शिवाय माझे यथार्थ स्वरूप कळणार नाही, कारण मुग्दल पुराणांत माझे पूर्ण आणि सर्व प्रकाशक स्वरूप प्रगट झाले आहे.'

# ❀ अनुक्रमणिका ❀

## द्वितीय खंड

## तृतीय खंड

[ महोदर चरित्र ]

## चतुर्थ खंड

[गजानन चरित्र]

## पंचम खंड

[ लंबोदर चरित्र ]

## षष्ठ खंड

## सप्तम खंड

[ विघ्नराज खंड ]



## अष्टम खंड

[ धूम्रवर्णचरित्र ]

## नवम खंड

## यंत्र



## स्तोत्रे, आरत्या व भूपाळ्या



## भूपाळ्या



## आरत्या



* * *